**नादुरुस्त विद्युत रोहित्रे तात्काळ बदलण्यासाठी "निरंतर वीज योजना" अंतर्गत महावितरण कंपनीस सन २०२४-२५ मध्ये सहाय्यक अनुदानापोटी रू.१००.०० कोटी निधी रोखीने वितरित करणेबाबत. (के-६, मुख्य लेखाशिर्ष-२८०१२६२४)**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.३१६/ऊर्जा-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०७ मार्च, २०२५

**संदर्भ:-** १. शासन निर्णय समक्रमांक : दि.०५.०३.२०२४ व दि.२६.०३.२०२४
२. शासन निर्णय क्रमांक : क्र.पुनर्वि-२०२४/प्र.क्र.३२/ऊर्जा-३, दि.३०.०३.२०२४
३. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.३१६/ऊर्जा-५, दि.३०.०३.२०२४
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४
५. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दि.२९.०७.२०२४
६. शासन निर्णय क्रमांक : क्र.पुरमा-२०२४/प्र.क्र.७८/ऊर्जा-३, दि.०३.०९.२०२४
७. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०२३/प्र.क्र.३१६/ऊर्जा-५, दि.१४.१०.२०२४

**प्रस्तावना** :-

ग्राहकांना अखंडीत व योग्य भाराने वीज पुरवठा होण्यासाठी रोहित्रे सुस्थितीत असणे महत्वाचे आहे. रोहित्रे वारंवार बिघाड होण्याचे प्रमाण वाढले तर शेती व बिगरशेती ग्राहकांचा वीजपुरवठा खंडीत होतो आणि शेतकऱ्यांना पाणी असूनही योग्य वेळेत पिकांना सिंचन मिळत नाही. परिणामी उत्पन्नात घट होते. म्हणून विद्युत पुरवठा सुरळीत व्हावा आणि रोहित्रे जळण्याचे प्रमाण कमी व्हावे या हेतुने मा.उपमुख्यमंत्री तथा मंत्री (वित्त) यांनी अर्थसंकल्पिय अधिवेशन २०२३-२४ मध्ये नादुरुस्त विद्युत रोहित्र तात्काळ बदलण्यासाठी योजना जाहिर केली आहे. या अनुषंगाने महावितरण कंपनीने सादर केलेल्या वर्षनिहाय नियोजनानुसार "निरंतर वीज योजना" सुरु करणेबाबत शासन निर्णय दि.०५.०३.२०२४ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सदर योजनेअंतर्गत शासन निर्णय दि.२६.०३.२०२४ व दि.३०.०३.२०२४ अन्वये सन २०२३-२४ मध्ये रु.२००.०० कोटी इतका निधी रोखीने व रु.१००.०० कोटी इतका निधी पुर्नविनियोजनाने महावितरण कंपनीस वितरीत करण्यात आला आहे.शा.नि.दि.०५.०३.२०२४ अन्वये सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरिता निरंतर वीज योजनेअंतर्गत ग्राहकांना अखंडीत आणि दर्जेदार वीजपुरवठा देण्याकरिता १५ वर्षापेक्षा जास्त जुने व तांत्रिकदृष्ट्या अकार्यक्षम असलेले विद्युत रोहित्रे बदलण्याकरिता रु.४८०.०० कोटी व विद्युत रोहित्रांचे ऑईल बदलण्याकरिता रु.१२०.०० कोटी असे एकूण रु.६००.०० कोटी खर्चास मंजूरी देण्यात आली आहे. सन २०२४-२५ करिता निरंतर वीज

योजनेअंतर्गत रु.५५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला असून त्यापैकी वित्त विभागाच्या मान्यतेने रु.३३०.०० कोटी इतका निधी समायोजनाने संदर्भ क्र.७ वरील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आला आहे. आता वित्त विभागाच्या मान्यतेने सदर योजनेंतर्गत उर्वरित निधी रु.२२०.०० कोटीपैकी रु.१००.०० कोटी निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

(१) निरंतर वीज योजनेअंतर्गत ग्राहकांना अखंडीत आणि दर्जेदार वीजपुरवठा देण्याकरिता १५ वर्षापेक्षा जास्त जुने व तांत्रिकदृष्ट्या अकार्यक्षम असलेले विद्युत रोहित्रे बदलण्याकरिता रु.१००,००,००,०००/- (रुपये शंभर कोटी फक्त) इतका निधी महावितरण कंपनीस रोखीने वितरित करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

(२) सदर शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या अर्थसहाय्याची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे, त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची दक्षता महावितरण कंपनीने घ्यावी.

(३) सन २०२४-२५ या वर्षाकरिता १५ वर्षापेक्षा जास्त जुने व तांत्रिकदृष्ट्या अकार्यक्षम असलेले विद्युत रोहित्रे बदलण्याकरिता येणारा खर्च सुमारे रू.१००.०० कोटी अनुदान स्वरूपात महावितरण कंपनीस देण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर खर्च मागणी क्र.के-६, मुख्य लेखाशीर्ष २८०१, वीज, ०५ पारेषण व वितरण, ८०० इतर खर्च, (००)(०२) महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी मर्यादित यांस सहायक अनुदान (कार्यक्रम) ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) लेखाशिर्ष क्र.२८०१२६२४ या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ करिता मंजूर अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

(४) सदरची रक्कम अधिदान व लेखा अधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून काढून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित, मुंबई यांना अदा करण्यासाठी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून श्रीमती अंकिता बोऱ्हाडे, कक्ष अधिकारी (ऊर्जा-३) व नियंत्रण अधिकारी म्हणून श्री.ना.श्री.कराड, सह सचिव (ऊर्जा-३), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत आहे. सदर मंजूर झालेली रक्कम रु.१००,००,००,०००/- (रुपये शंभर कोटी फक्त) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई येथून महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी मर्यादित यांच्या नावे स्वतंत्ररित्या धनादेश काढून वितरित अथवा NEFT/RTGS Fund Transfer द्वारे निधी हस्तांतरित करण्याची कार्यवाही करावी.

३. या लेखाशिर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. तसेच उपयोगिता प्रमाणपत्र प्रलंबित नाही. सदर देयक हे सशर्त असून वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.२५/०७/२०२४ व १२/०२/२०२५ रोजीच्या परिशिष्टातील तपासणी अटीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. ६६ /व्यय-१६, दि.२७.०२.२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२५०३०७१६३२३३५११०** असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

NARAYAN SHRIKRISHNA KARAD

Digitally signed by NARAYAN SHRIKRISHNA KARAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=fc35aa8ffade5bb6105200693c60a32b755f7e67f72965b8dd57adaa570981f1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AE7FAEABAF4571C2748E4DD5FFD2CD108DE0E130859970F4D7D0EE40046B3E9E, cn=NARAYAN SHRIKRISHNA KARAD
Date: 2025.03.07 16:33:22 +05'30'

**(ना.श्री.कराड)**

**शासनाचे सह सचिव**

**प्रत:-**

१) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव,राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा. अध्यक्ष/उपाध्यक्ष विधानसभा,सभापती/उपसभापती विधानपरिषद,यांचे सचिव.
३) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन), यांचे प्रधान सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. मंत्री अपारंपारिक ऊर्जा,यांचे खाजगी सचिव मंत्रालय,मुंबई-३२.
६) मा. राज्यमंत्री ऊर्जा, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
७) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई-३२.
८) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई-३२.
९) सर्व विधानसभा/विधानसभा सदस्य.
१०) मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
११) अपर मुख्य सचिव (वित्त) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) अपर मुख्य सचिव (नियोजन ) मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अपर मुख्य सचिव (ऊर्जा ) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/ सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१५) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत मंडळ सुत्रधारी कंपनी, फोर्ट, मुंबई.
१६) अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वीज वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१८) महालेखापाल (लेखा व परिक्षा),महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.
१९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
२०) अधिदान व लेखा अधिकारी (अराप/रालेवि-१), मुंबई.
२१) अधिदान व लेखा अधिकारी,अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
२२) सह सचिव,(अर्थसंकल्प/व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
२३) कक्ष अधिकारी (प्रशासन-१),उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग
२४) निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.